# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक- सीआरपी-०२१६/प्र.क्र.१५९/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक १६ मार्च २०१७.

**विषय** :- महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक, च्या आवारातील **निवासी** इमारती यांची दुरुस्तीची कामे करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-

1. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१./प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-ब/ २८-ब-२/ रस्ते-तयार-करणे-मपोअ नाशिक/ २८२/१५, दिनांक २२.०२.२०१७.

**ज्ञापन** :-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्राद्वारे, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक, च्या आवारातील निवासी इमारती यांची दुरुस्तीची कामे करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

**२.** उक्त कामासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक, यांनी सन २०१६-१७ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.३,१०,००,०००/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत.

**३.** उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते रु.३,२७,८४,४६३/- असे सुधारित केले आहेत. त्या अनुसार महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक, च्या आवारातील निवासी इमारती यांची दुरुस्तीची कामे करण्यासाठी **रु.३,२७,८४,४६३/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रदेश, नाशिक, यांनी उक्त खर्चाचे अंदाज साक्षांकित करण्याच्या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**४.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग- मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (००) (०१), जिल्हा पोलीस बल, (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, या खाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**५.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५५८/इमा-२, दिनांक २७.१२.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३१७१३०५५३०८२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.17 13:07:10 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
८) निवड फाईल (पोल-७).